**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक- कअनि - १११९ /प्र.क्र.४५ /१४-ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १६ मार्च, २०२०

<u>संदर्भ</u> : १) सामान्य प्रशासन विभाग, शा.आ.क्र.कअनि १११९/प्र.क्र.४५/१४ब, दिनांक ३१.०७.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, का.आ.क्र.संकीर्ण १९१९/प्र.क्र.१२६/२०१९/स्वासैक-१, दिनांक १५.०२.२०२०

# आदेश

श्री.मं.हिं.बनसोडे, कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग हे सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील सदस्य सचिव, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती यांचे "स्वीय सहायक" या पदावर दिनांक ०५.०८.२०१९ पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत होते. श्री. बनसोडे, कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवा संदर्भाधीन क्र. २ येथील आदेशान्वये दिनांक १५.०२.२०२० (म.नं.) पासून प्रत्यावर्तित करण्यात आल्या आहेत.

२. सदर आदेशान्वये श्री.मं.हिं.बनसोडे, कक्ष अधिकारी यांची प्रतिनियुक्तीच्या सेवा प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना बहुजन कल्याण विभागामध्ये कक्ष अधिकाऱ्याच्या रिक्त पदावर करण्यात येत आहे. श्री.मं.हिं.बनसोडे, कक्ष अधिकारी यांनी बहुजन कल्याण विभागामध्ये तत्काळ रूजू व्हावे.

३. श्री.मं.हिं.बनसोडे, कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवा दिनांक १५.०२.२०२० (म.नं.) पासून प्रत्यावर्तित करण्यात आल्या आहेत. श्री.बनसोडे, कक्ष अधिकारी यांचा दिनांक १६.०२.२०२० ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९(१४)(एफ) नुसार व शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०२.०६.२००३ मधील तरतुदीनुसार बहुजन कल्याण विभागाने करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१६१५५२०६४८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.03.16 15:55:14 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री.मं.हिं.बनसोडे, कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

**प्रत**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, बहुजन कल्याण विभाग/पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

२) मा.सदस्य सचिव, स्वातंत्र्य उच्चाधिकार समिती, नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) सह /उप सचिव (आस्थापना), बहुजन कल्याण विभाग/पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) उप सचिव (स्वासैक १), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) निवडनस्ती (कार्या-१४ब).